**बाहययंत्रणेद्वारे (आऊटसोर्सिग) घेण्यात आलेल्या सुरक्षा रक्षकांच्या सेवा घेण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुरक्षा-२०२३/ प्र.क्र.११०/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,

गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

**दिनांक : २३ मे, २०२३.**

वाचा

१) शासन निर्णय ,उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.एमजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दि.०८.११.२००६.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.०२.२०१३.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.०२.२०१३.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.१२.२०१६.

५) सहसंचालक,आरोग्य सेवा,रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. : आसेआ/ कक्ष-३/टे-२/न.क्र. / सुरक्षा रक्षक प्रलंबित देयके/१९०४-०७/२३, दि.०१.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

जिल्हा शल्य चिकित्सक,सर्वोपचार रुग्णालय, नागपूर यांनी ग्रामीण रुग्णालय देवलापार येथील कंत्राटी सुरक्षा रक्षकांची माहे फेब्रुवारी २०२० ते मार्च २०२० ची या कालावधीची देयके अनुदानाअभावी प्रलंबित असल्याने त्यास एक वर्षापेक्षा जास्त कालावधी झाल्याने देयकास मंजूरी देण्याबाबत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा शल्य चिकित्सक,सर्वोपचार रुग्णालय, नागपूर यांनी ग्रामीण रुग्णालय देवलापार येथील कंत्राटी सुरक्षा रक्षकांची माहे फेब्रुवारी २०२० ते मार्च २०२० या कालावधीची प्रलंबित देयकांची रक्कम रु. १,५२,५१२/ (अक्षरी रुपये एक लक्ष बावन्न हजार पाचशे बारा फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/ प्र.क्र.३० / २०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, अन्वये, वित्तिय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग - पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र.६,नियम क्रमांक ४० अनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च “मागणी क्र.आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१) (०८) प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (अनिवार्य)-, (२२१० ०४१३)

१३ - कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या वित्तिय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९२१४४४०८२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.05.23 16:21:58 +05'30'

( अशोक मा. आत्राम )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, सर्वोपचार रुग्णालय, नागपूर.
८. महालेखापाल १/२,महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा)/लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
९. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).